संगणक सांकेतीक - २०१७०५०३१२२२३३८३०७.

लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांनी सुनावणी नेमलेल्या तारखेला संबंधीत अधिका-यांनी उपस्थित राहण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक एलपीएल-1595/प्र.क्र.90/95/15.
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 15 मार्च 1997.

वाचा :- 1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एलपीएल-1089/1096/41/11, दिनांक 8 डिसेंबर 1989
2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एलपीएल-1095/प्र. क्र. 90/95/15, दिनांक 26 ऑक्टोबर 1995.
3) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एलपीएल-1095/प्र. क्र. 89/95/15, दिनांक 31 ऑक्टोबर, 1995.
4) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एलपीएल-2195/प्र. क्र. 118/95/15, दिनांक 20 डिसेंबर 1995.

परिपत्रक :- लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांच्याकडून आलेल्या पत्रव्यवहाराला विधानसभा, विधानपरिषदे प्रमाणे अग्रक्रम द्यावा. त्यावर सत्वर कार्यवाही करणे, त्या कार्यालयास विहित मुदतीत माहिती पाठविणे आणि मा. लोकआयुक्त व मा. उप लोकआयुक्त यांनी महाराष्ट्र, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त, अधिनियम 1971 च्या कलम 12(2) व कलम 12(4) अन्वये केलेल्या शिफारशींवर सत्वर कार्यवाही करुन त्याबाबतचा अहवाल त्या कार्यालयास विहित मुदतीत पाठविणे, याबाबत शासनाने वेळोवेळी सूचना दिलेल्या आहेत.

उपरोक्त दिनांक 26 ऑक्टोबर, 1995 च्या परिपत्रकानुसार परिच्छेद 1 मधील अनुक्रमांक 7 अन्वये महाराष्ट्र, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त अधिनियम, 1971 च्या कलम 11 च्या तरतुदीनुसार मा. लोकआयुक्तांनी एखाद्या प्रकरणाच्या संदर्भात सुनावणीस बोलाविले आणि जर अन्य महत्त्वाच्या शासकीय कामामध्ये सदर अधिकारी व्यग्र असेल तर त्या अधिका-याने उपस्थिती माफ करुन घ्यावी किंवा सुनावणीचा दिनांक बदलून घ्यावा असे सुचविण्यात आले होते.

आता अशी सूचना देण्यात येते की, त्यांना सदर सुनावणीस महत्त्वाच्या प्रशासकीय कामकाजामुळे हजर होता आले नाही तर सुनावणीच्या दिनांकाला संबंधीत प्रकरणाची सांगोपांग माहिती असलेला असा वर्ग-1 चा अधिकारी सुनावणीसाठी पाठवावा म्हणजे मा. लोकआयुक्त किंवा मा. उप लोकआयुक्त यांना प्रकरणांचा त्वरेने निपटारा करणे शक्य होईल.

तरी उपरोक्त पध्दतीने कार्यवाही व्हावी असे या आदेशान्वये कळविण्यात येत आहे.

हे परिपत्रक सर्व कर्मचारी व अधिकारी यांच्या दृष्टोत्पत्तीस आणावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

रवि भू. बुध्दिराजा,
सचिव (सेवा),
सामान्य प्रशासन विभाग.

प्रति
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मुंबई,
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मुंबई,
शासनाचे मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग,
शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव,
शासनाचे सर्व प्रधान सचिव/सचिव,
प्रबंधक लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय (पत्राने)
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखाली सर्व विभाग/कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने